**इंदिरा गांधी सामान्य रुग्णालय, इचलकरंजी, जि.कोल्हापूर येथे ४० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे असलेले परिचर्या प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नर्सिंग-२०२४/प्र.क्र.१३६५/सेवा-५**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २५ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-**

१. उपसंचालक (शुश्रृषा) आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/शुश्रृषा/कक्ष-९/टे-४/इचलकरंजी नर्सिंग स्कूल/५६४८/२४, दि.१३.११.२०२४

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त इंदिरा गांधी सामान्य रुग्णालय, इचलकरंजी, जि.कोल्हापूर या रुग्णालयांचे २०० खाटावरून ३०० खाटांच्या रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्यात आले आहे. रुग्णालयात दाखल होणाऱ्या रुग्णांची संख्या मोठया प्रमाणात वाढली आहे. परिणामी रुग्णांना प्रभाविपणे शुश्रृषा सेवा उपलब्ध करून देण्यानुषंगाने भारतीय परिषदेच्या मानंकानुसार इंदिरा गांधी सामान्य रुग्णालय, इचलकरंजी, जि.कोल्हापूर येथे ४० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह परिचर्या प्रशिक्षण केंद्र (जीएनएम) सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील इंदिरा गांधी सामान्य रुग्णालय, इचलकरंजी, जि.कोल्हापूर येथे परिचर्या प्रशिक्षण केंद्र (जीएनएम) ४० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह सुरु करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर अभ्यासक्रमाबाबतचा तपशिल पुढीलप्रमाणे:-

**अभ्यासक्रमांबाबतचा तपशिल:-**

| अ.क्र. | भारतीय परिचर्या परिषदेचे मानके | General Nursing & Midwifery (GNM) |
|---|---|---|
| १ | अभ्यासक्रमाचे नाव | सामान्य परिचर्या व प्रसाविका प्रशिक्षण (जी.एन.एम.) |
| २ | संस्था | इंदिरा गांधी मेमोरीयल सामान्य रुग्णालय, इचलकरंजी जि.कोल्हापूर |
| ३ | प्रवेश अटी व शर्ती प्रवेशाकरीता पात्रता | बारावी उत्तीर्ण |
| ४ | प्रवेश प्रक्रिया | राज्य सामाईक प्रवेश कक्ष (CET) |
| ५ | विद्यार्थी प्रवेश क्षमता | ४० प्रती वर्षी |
| ६ | Examination Board | Maharashtra State Board of Nursing & Paramedical Examination |

**अटी व शर्ती:-**

१. सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता राज्य शासन / केंद्रशासन / मा.सर्वोच्च न्यायालय अथवा मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार कार्यपध्दती अवलंबण्यात यावी.

२. भारतीय परिचर्या परिषद, नवी दिल्ली, महाराष्ट्र राज्य शुश्रृषा परिषद व राज्य शासन यांनी जीएनएम नर्सिंग अभ्यासक्रमासाठी वेळोवेळी विहित केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे संस्थेस बंधनकारक राहील.

३. भारतीय परिचर्या परिषद, नवी दिल्ली यांनी घातलेल्या अटींची पूर्तता करणे संस्थेस बंधनकारक राहील.

४. भारतीय परिचर्या परिषद, नवी दिल्ली, महाराष्ट्र राज्य शुश्रृषा परिषद यांनी जीएनएम नर्सिंग अभ्यासक्रमासाठी विहित केलेल्या प्रमाणकांची योग्यरित्या पूर्तता करुन संस्थेने दरवर्षी पदिषदेची/मंडळाची मान्यता मिळविणे आवश्यक आहे.

५. संस्थेने जीएनएम नर्सिंग अभ्यासक्रमास महाराष्ट्र शुश्रृषा व परावैद्यक शिक्षण मंडळाची संलग्नता मिळाल्यानंतरच विद्यार्थी प्रवेशित करावेत.

६. संस्थेने कोणत्याही परिस्थितीत शासनाने मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेशित करुन नयेत.

२. सदर परिचर्या प्रशिक्षण केंद्र सुरू करण्यासाठी येणाऱ्या खर्चाकरीता आर्थिक तरतूद उपलब्ध करून घेण्याबाबतची कार्यवाही उपसंचालक (शुश्रृषा),आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांनी करावी.

३. तसेच, सदर अभ्यासक्रमास महाराष्ट्र शुश्रृषा मंडळाची संलग्नता मिळण्याच्या दृष्टीने आवश्यक प्रस्ताव वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास सदर करण्याची कार्यवाही आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२५१२२३४५३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यातच येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL MAHADEV KUMERIYE

Digitally signed by ANIL MAHADEV KUMERIYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7de2c699c260e8b545f2736f6acef82da11a2da0a65565e5bcb99995bc112fe6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C4770170FA4EC3BAEC96D0FA6B787BC46960639B94799F693E5F126CA6F1AF70, cn=ANIL MAHADEV KUMERIYE
Date: 2025.02.25 12:26:18 +05'30'

**( अनिल कुमेरीये )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई/पुणे.
३) उपसंचालक (शुश्रृषा) आरोग्य सेवा, मुंबई.
४) उपसंचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर
५) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, कोल्हापूर
६) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
७) मा.मंत्री (साआ व कु क ) यांचे खाजगी सचिव
८) मा.राज्यमंत्री (साआ व कु क ) यांचे खाजगी सचिव
९) सचिव-१ (साआवि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१०) सचिव-१ (साआवि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
११) सचिव(वै.शि. व औ द्र.वि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१२) निवडनस्ती (सेवा-५)